स्थानिक क्षेत्रातील योजना-
सुधारित उपलेखाशीर्ष उघडण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन.**
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय - अनिवि-2011 /प्र.क्र. 25/अर्थ-3,
मंत्रालय, मुंबई - 400 032,
दिनांक : 24/08/2011

**संदर्भ-** ग्रामविकास विभागाचे क्र.तेविआ-2010/प्र.क्र.66/वित्त-4,
दि.09/12/2010 चे पत्र

**प्रस्तावना :** राज्याला 13 व्या वित्त आयोगाच्या निधीच्या माध्यमातून जनरल परफॉर्मन्स ग्रॅन्ट व स्पेशल एरिया परफॉर्मन्स ग्रॅन्ट सन 2011-12 पासून प्राप्त होणार आहेत. तथापि हा निधी 13 व्या आयोगाने विहित केलेल्या 9 अटींची पूर्तता केल्यानंतरच राज्यास, पर्यायाने राज्यातील पंचायत राज संस्थांना मिळणार आहे. पूर्तता करावयाच्या 9 अटींपैकी एक महत्वाची अट म्हणजे राज्याच्या मूल अर्थसंकल्पीय दस्तऐवजासोबत जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत यांना अनुक्रमे 196, 197 व 198 या गौण लेखाशीर्षाखाली वितरीत करावयाच्या योजनेतर व योजनांतर्गत निधीची स्वतंत्र पुरवणी लावणे हा आहे. त्यास अनुसरून स्थानिक क्षेत्रातील योजनेसाठी सुधारित उपलेखाशीर्ष उघडण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :** स्थानिक क्षेत्रातील योजना यासाठी यापूर्वी अस्तित्वात असलेल्या लेखाशीर्षातील सन 2011-2012 या आर्थिक वर्षापासून खालीलप्रमाणे सुधारित उपलेखाशीर्ष उघडण्यास याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मुख्य लेखाशीर्ष 2059, सार्वजनिक बांधकामे,<br>80, सर्वसाधारण<br>196 जिल्हा परिषदांना सहाय्य<br>स्थानिक क्षेत्रातील योजना-<br>(01)(02) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, 1961 याच्या कलम 182 अन्वये, जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने (2059 2125)<br>योजनेतर | MH 2059, Public Works<br>80, General<br>196 Assistance to Zilla Parishads<br>Schemes in the Local Sector<br>(01)(02) Purposive grants to Zilla Parishads under section 182 of Maharashtra Zilla Parishad and Panchayat Samitee Act 1961<br>(2059 2125)<br>Non-Plan Non-Plan |

सन 2011-12 या वित्तीय वर्षातील होणारा संपूर्ण खर्च उपरोक्त लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३६७/११/अर्थ-१२, दिनांक ०५/०५/२०११ व महालेखाकार नागपूर यांच्या संदर्भ् क्र. TM/ Gr.-III/ UOR/ 599, दिनांक ०३/०८/२०११ मधील मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक (२०११०८२६१२२७२९००१) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अ.र.झेपले)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
महालेखापाल-1 महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
महालेखापाल-2 महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
वित्त विभाग(अर्थसंकल्प 2,12) मंत्रालय,मुंबई-32
ग्राम.विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-32
संचालक,लेखा व कोषागार,मुंबई.
सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी सार्वजनिक बांधकाम विभाग
सर्व मुख्य अभियंते,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
सर्व अधीक्षक अभियंते,सार्वजनिक बांधकाम मंडळ
स्वीय सहाय्यक, सचिव (रस्ते/बांधकामे) ,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई-32
निवडनस्ती (अर्थ-3)

D:\common\GR opening new head Bud3.doc